**केंद्र/राज्य पुरस्कृत सुरक्षित शहर प्रकल्पांतर्गत मुंबई शहरासाठी महिला सुरक्षितता पुढाकार योजनेसाठी गठीत प्रकल्प अंमलबजावणी समितीची पुनर्रचना करण्याबाबत व तांत्रिक पुनरावलोकन समिती रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९/विशा-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २९ सप्टेंबर, २०२१.

वाचा:-
१) शासन निर्णय, गृह विभाग, पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९/विशा-६, दि.०८.०३.२०१९.
२) शासन निर्णय, गृह विभाग, पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९/विशा-६,दि.२५.०७.२०१९.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे दि.१७.०५.२०२१ रोजीचे पत्र.

प्रस्तावना:-

सार्वजनिक ठिकाणी महिलांवर होणाऱ्या अत्याचाराच्या घटनांवर परिणामकारकरीत्या आळा घालण्याच्या दृष्टीने व महिलांच्या सुरक्षिततेसंदर्भात कायमस्वरूपी उपाययोजना करण्यासाठी केंद्र शासनाच्या गृह आणि महिला व बाल कल्याण मंत्रालयाने सुरक्षित शहर प्रकल्पांतर्गत महिला सुरक्षितता पुढाकार योजना राबविण्यासंदर्भात महाराष्ट्र राज्यातील मुंबई या शहराची निवड केली आहे. सदर योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी दिनांक ०८.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करण्यात आलेली होती. तसेच, प्रकल्प अंमलबजावणी समितीने (Project Implementation Committee) शिफारस केल्याप्रमाणे दिनांक २५.०७.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये तांत्रिक पुनरावलोकन समिती गठीत करण्यात आलेली होती. प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) पुनर्रचना करण्याची आणि तांत्रिक पुनरावलोकन समिती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजनेची काटेकोरपणे व परिणामकारक अंमलबजावणी करण्याकरिता संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ०८.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | पोलीस आयुक्त, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह पोलीस आयुक्त (गुन्हे), मुंबई | सदस्य सचिव |
| ३ | सह पोलीस आयुक्त (का. व सु.), मुंबई | सदस्य |
| ४ | आयुक्त, महिला व बाल विकास विभाग | सदस्य |
| ५ | अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका | सदस्य |
| ६ | व्यवस्थापकीय संचालक, बेस्ट, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ७ | महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई | निमंत्रित सदस्य |

२. तसेच, संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २५.०७.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेली तांत्रिक पुनरावलोकन समिती रद्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२९१५०६४३१५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shirish Nagorao Mohod

Digitally signed by Shirish Nagorao Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66fda7e745bb4928b21046cecbf7bd8f40e4950e0a99497fa2862e1d37ed75b7, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Nagorao Mohod
Date: 2021.09.29 17:36:15 +05'30'

**( शिरीष मोहोड )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (गृह/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, परिवहन, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.
१५. व्यवस्थापकीय संचालक, बेस्ट, मुंबई.
१६. संचालक, रेल्वे, मुंबई.
१७. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
१८. वित्त विभाग (कार्या. व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती (विशा-६), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.